**जलसंपदा विभागांतर्गत वाल्मी, मेटा व प्रादेशिक प्रशिक्षण केंद्रातील प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी व प्रशिक्षणास नामांकने पाठविण्यासाठी "ई टाईम्स" या प्रणालीचा वापर अनिवार्य करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. ईप्रमं-२०१७/(४३/२०१७)/ निवसं-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० एप्रिल २०१७

वाचा: १) शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१५/ (१३/२०१५)/संकाक दि. ०२/०६/२०१५
२) शासन पत्र क्र. संकिर्ण-२०१५/ (१३/२०१५)/संकाक दि. १३/०७/२०१५

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र शासनाने स्विकारलेल्या ई-प्रशासन धोरणानुसार जलसंपदा विभागामार्फत विविध प्रकारचे ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यात येत आहेत. त्यानुसार जलसंपदा विभागांतर्गत वाल्मी, मेटा व त्या अंतर्गत सर्व प्रादेशिक प्रशिक्षण केंद्रातील प्रशिक्षण व्यवस्थापन, क्षेत्रिय स्तरावरुन प्रशिक्षणास नामांकने पाठविण्यासाठी आणि या अधिकारी/कर्मचारी यांची राज्य प्रशिक्षण धोरणानुसार निवड करण्यासाठी संदर्भ क्र. १ च्या समितीच्या शिफारशींच्या अनुषंगाने "e-Training Information Management and Evaluation (eTIMES)[ई-प्रशिक्षण माहिती व्यवस्थापन व मुल्यमापन प्रणाली" (ई-टाईम्स)] ही प्रणाली विकसीत केलेली आहे.

या प्रणालीद्वारे वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमांची माहिती सर्व अधिकारी / कर्मचारी यांचेपर्यंत पोहचविणे, त्यांचेकडुन प्रशिक्षणासाठी ऑनलाईन नामांकने मागविणे, प्रशिक्षणार्थींची निवड करुन त्यांना त्याबाबत कळविणे, प्रशिक्षण नोंदणी, प्रशिक्षण कार्यक्रमाची आखणी करणे, प्रशिक्षण संपल्यानंतर प्रमाणपत्र देणे, घेतलेल्या प्रशिक्षणाची नोंद ऑनलाईन पध्दतीने ई-सेवा पुस्तकात घेणे, गैरहजर राहणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांचेबाबत कार्यवाही करणे, प्रशिक्षण मूल्यमापन करणे, लेखा तयार करणे, इस्टेट व्यवस्थापन इ. कार्यवाही प्रणालीमार्फत पार पाडण्यात येणार असून सदरची प्रणाली यापुढे अनिवार्य करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:**

१.० जलसंपदा विभागांतर्गत अधिकारी व कर्मचाऱ्यांना विविध कौशल्याचे प्रशिक्षण देण्यासाठी त्यांची नामांकने करणे व प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी यापुढे "ई-टाईम्स" ह्या प्रणालीचाच वापर अनिवार्य करण्यात येत आहे.

२.० प्रशिक्षण व्यवस्थापन व नामांकने यासाठी प्रशिक्षण संस्था, प्रशिक्षण व्यवस्थापक व प्रशिक्षणार्थी या तीनही घटकांचा समावेश असून त्यांचे कार्य व जबाबदा-या खालील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

**२.१ प्रशिक्षण संस्था:**

जलसंपदा विभागातील वाल्मी औरंगाबाद, मेटा नाशिक व त्या अंतर्गत तीनही प्रादेशिक प्रशिक्षण केंद्र या संस्थांनी प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी “ई-टाईम्स” या प्रणालीचा वापर करावा. या प्रणालीद्वारे वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमांची माहिती सर्व अधिकारी / कर्मचारी यांना उपलब्ध करुन देणे, त्यांचेकडुन प्रशिक्षणासाठी ऑनलाईन नामांकने मागविणे, प्रशिक्षणार्थींची निवड करुन त्यांना त्याबाबत कळविणे, प्रशिक्षण नोंदणी करणे, प्रशिक्षण कार्यक्रमाची आखणी करणे, प्रशिक्षण संपल्यानंतर प्रमाणपत्र देणे, घेतलेल्या प्रशिक्षणाची नोंद ऑनलाईन पध्दतीने ई-सेवा पुस्तकात घेणे, गैरहजर राहणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांचेबाबत कार्यवाही करणे, प्रशिक्षणाचे मूल्यमापन करणे, लेखा तयार करणे, इस्टेट व्यवस्थापन ही सर्व कार्यवाही करावी.

**२.२** प्रशिक्षण संस्थानी दर वर्षी ३१ मार्च पर्यंत पूढील वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमाची आखणी ई-टाईम्स प्रणाली वर प्रसिध्द करावी.

**२.३** प्रशिक्षण संस्थानी ई-टाईम्स प्रणालीद्वारे प्रशिक्षण व्यवस्थापनासाठी स्वतंत्र समन्वय अधिकारी नियुक्त करावा. समन्वय अधिकाऱ्याने ई-टाईम्स प्रणाली वापरताना येणा-या अडचणीबाबतचे निराकरण करावे. तसेच प्रणाली मध्ये उद्भवणा-या तांत्रिक अडचणी प्रशिक्षण व्यवस्थापकांमार्फत अधीक्षक अभियंता ई-गव्हर्नन्स मंडळ यांच्या निदर्शनास आणून द्याव्यात.

**३.० प्रशिक्षण व्यवस्थापक (Training Manager-TM):**

जलसंपदा विभागात कार्यरत सर्व सहायक मुख्य अभियंते व सहायक अधीक्षक अभियंते यांना त्यांच्या प्रदेशांतर्गत व मंडळाच्या अधिपत्याखाली असणा-या सर्व कार्यालयांसाठी प्रशिक्षण व्यवस्थापक म्हणून घोषित करण्यात येत आहे. प्रशिक्षण व्यवस्थापकांनी त्यांच्या अंतर्गत असलेल्या अधिका-यांची नामांकने प्रशिक्षण संस्थांकडे प्रचलीत पध्दतीने न पाठवता ई-टाईम्स प्रणालीमधूनच पाठवावीत. तसेच ज्या प्रशिक्षणार्थींनी प्रशिक्षणासाठी स्वत: नामांकने दिलेली आहेत त्यांची त्या त्या प्रशिक्षणासाठीची विनंती मान्य / अमान्य करणे, तसेच निवड झालेल्या अधिका-यांना प्रशिक्षणास उपस्थित राहण्याबाबत वेळोवेळी सुचित करणे इ. कामे करावीत.

**३.१** ज्या प्रशिक्षणार्थींनी प्रशिक्षणासाठी स्वत: नामांकने दिलेली आहेत त्याबाबत प्रशिक्षण व्यवस्थापकांनी ७ दिवसाच्या आत निर्णय घ्यावा (मान्य/अमान्य).

**३.२** ई-टाईम्स प्रणाली ही ई-सेवा पुस्तकासोबत सलंग्न केलेली आहे. त्यामळे ई-सेवा पुस्तकाची माहिती अद्ययावत ठेवण्याची जबाबदारी प्रशिक्षण व्यवस्थापकांची राहील.

**४.० प्रशिक्षणार्थी:**

**४.१** जलसंपदा विभागातील अधिकारी / कर्मवारी वरील प्रशिक्षण ई-टाईम्स प्रणालीचा वापर करून संस्थांमधील प्रशिक्षणासाठी स्वत: नामांकन पाठवू शकतील.

**४.२** प्रशिक्षणार्थींनी यापूढे फक्त ई-टाईम्स प्रणालीच्या माध्यमातूनच नामांकने पाठवावीत.

**४.३** प्रशिक्षण संस्थानी उपलब्ध करून दिलेल्या वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमामधून प्रशिक्षणार्थींनी इच्छुक प्रशिक्षणास प्रणालीचा वापर करून नामांकने पाठवावीत.

**५.० प्रणाली व्यवस्थापक**

**५.१** ई-प्रशासन मंडळ अंतर्गत असलेल्या प्रशासन संगणीकरण विभाग, पुणे या कार्यालयांमधील एका अधिकाऱ्याची ई-टाईम्स प्रणाली व्यवस्थापक म्हणून नेमणूक करण्यात यावी. प्रणाली मध्ये कोणतेही बदल (पासवर्ड बदलणे, इत्यादी) करण्यासाठी प्रणाली व्यवस्थापक यांच्याशी संपर्क करुन बदल करून घ्यावेत.

**५.२** प्रणाली मध्ये उद्भवणा-या तांत्रिक अडचणी व प्रशिक्षण संस्था ह्यांच्या कडून वेळोवेळी समस्यांचे निराकरण प्रणाली व्यवस्थापकांनी करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४१०१६०९५३६७२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=544e07f06fbab100dc2bfe33db79fc14350d78d6c16f8feab484d842c496717d, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2017.04.10 16:12:07 +05'30'

**(डॉ.संजय बेलसरे)**
अधीक्षक अभियंता व उप सचिव (निवसं)

**प्रत माहितीसाठी :-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
५) प्रधान सचिव (जसंवि व प्र), जलसंपदा विभाग, मुंबई
६) प्रधान सचिव, माहीती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
७) सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मुंबई
८) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मुंबई
९) महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद / संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक
१०) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
११) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१२) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव/ सहसचिव (सेवा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१५) सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
१७) कार्यासन निवसं-३